**राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देणेबाबत..**

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-२०१४/प्र.क्र.३०६/आरोग्य-५,**

जी.टी.रुग्णालय आवार, कॉम्प्लेक्स बिल्डींग, १० वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई- ४०० ००१.
तारीखः १६ जानेवारी, २०१५

संदर्भ :-

१) केंद्रीय आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाचे क्र. जी. २५०१२/२००९/एनआरएचएम फायनान्स, दि. १० फेब्रुवारी, २०१४ चे पत्र.
२) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. बीयुडी-२०१४/प्र.क्र.७५/अर्थसंकल्प, दि.२७ जून, २०१४.
३) आयुक्त, कुटुंब कल्याण व संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान यांचे क्र.राआसोम/ एफएमजी/राहि/४३४७०-७५/२०१४-१५, दि.०८.१०.२०१४ चे पत्र.

प्रस्तावना :

केंद्र शासनाने संपूर्ण देशात एप्रिल, २००५ पासून राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान सुरु केले आहे. राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानातंर्गत राज्यातील जनतेला विशेषता ग्रामीण जनता, गरीब, महिला व मुले यांना गुणवत्तापूर्ण आरोग्य सेवा उपलब्ध करुन देणे हे उद्दिष्ट आहे. याशिवाय सन २०१३-१४ या आर्थिक वर्षापासून नागरी विभागासाठी आरोग्य सेवा उपलब्ध करुन देण्यासाठी राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान सुरु करण्यात आले. राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान व राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान या दोन्ही योजनांचा समावेश राष्ट्रीय आरोग्य अभियान या योजनेत करण्यात आला आहे. राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यकमांचा समावेश राष्ट्रीय आरोग्य अभियान या योजनेत करण्यात आला आहे. या कार्यक्रमांकरिता उपलब्ध होणाऱ्या अनुदानाचे प्रमाण केंद्र शासनाकडून ७५ टक्के व राज्य शासनाकडून २५ टक्के असे आहे. यापूर्वी केंद्र शासनाच्या हिश्याची रक्कम राष्ट्रीय आरोग्य अभियानाच्या बँक खात्यात थेट जमा होत होती. त्यामुळे या कार्यक्रमांना प्रशासकीय मान्यता घेण्यात आली नव्हती. सन २०१४-१५ पासून या कार्यक्रमासाठी केंद्र शासन व राज्य शासन यांचेकडून उपलब्ध होणारे अनुदान कोषागारामार्फत राज्य आरोग्य सोसायटीस उपलब्ध होणार आहे. सदर कार्यक्रमांना एकत्रित निधीद्वारे अनुदान वितरणासाठी सा.आ.विभागाच्या वरील संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये नवीन लेखशिर्ष घेण्यात आले आहे. उक्त कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता असल्याशिवाय वित्त विभागाकडून निधी वितरीत केला जाणार नाही. त्यामुळे सदर कार्यक्रमांना प्रशासकीय मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार, राज्यात राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यास, तसेच सन २०१४-१५ वर्षाकरिता रु.४,२७,९६,०००/- च्या प्रकल्प आराखडयास खालीलप्रमाणे वित्तीय तरतूदीसह प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| कार्यक्रमाचे नांव | प्रशासकीय मान्यता रक्कम (केंद्र हिस्सा) (सन२०१४-१५) | प्रशासकीय मान्यता रक्कम (राज्य हिस्सा) (सन २०१४-१५) | एकूण (रु. लाखात) |
|---|---|---|---|
| राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रम | रु. ३९३.४२ | रु. ३४.५४ | **रु.४२७.९६** |

सदर कार्यक्रमांतर्गत सन २०१४-१५ करीता करण्यात आलेली वित्तीय तरतूद खालीलप्रमाणे लेखाशिर्षनिहाय वितरीत करण्यात येईल :

अ) २२१० : वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६ : सार्वजनिक आरोग्य, ८०० : इतर खर्च, केंद्रीय योजनांतर्गत योजना : ३१ : सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)

| कार्यक्रम | केंद्र हिस्सा ७५% | राज्य हिस्सा २५% |
|---|---|---|
| राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रम | जून, २०१४ अतिरिक्त अर्थसंकल्पिय अंदाजातील तरतूद, (सर्वसाधारण योजनेसाठी) (२२१० एफ ३४४) (केंद्र हिस्सा) (०१) (३७) राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रम, रु. ३,१९,००,०००/- | जून, २०१४ पुरवणी मागणीद्वारे केलेली तरतूद, (सर्वसाधारण योजनेसाठी) (२२१० एफ ३५३) (राज्य हिस्सा) (०१)(३७)राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रम, रु.१८,००,०००/- |

ब) २२१० : वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६ : सार्वजनिक आरोग्य, ७८९: अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना : (०१) अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत योजना : केंद्र पुरस्कृत योजना: ३१ : सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)

| कार्यक्रम | केंद्र हिस्सा ७५% | राज्य हिस्सा २५% |
|---|---|---|
| राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रम | डिसेंबर, २०१४, हिवाळी अधिवेशन पुरवणी मागणीद्वारे ७८९: अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना (०१) (२२) राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रम, (२२१० एफ ६७६) (केंद्र हिस्सा) रु. ४९,६०,०००/- | डिसेंबर, २०१४ हिवाळी अधिवेशन पुरवणी मागणीद्वारे ७८९: अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना (०१)(२३)राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रम, (२२१० एफ ६८५) (राज्य हिस्सा) रु.१६,५३,०००/- |

क) २२१० : वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१ : नागरी आरोग्य सेवा- विषयमचिकित्सा : ७९६: जनजाती क्षेत्र उपाययोजना : (०१) जनजाती क्षेत्र उपाययोजनेंतर्गत योजना : केंद्र पुरस्कृत योजना: ३१ : सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)

| कार्यक्रम | केंद्र हिस्सा ७५% | राज्य हिस्सा २५% |
|---|---|---|
| राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रम | डिसेंबर, २०१४, हिवाळी अधिवेशन पुरवणी मागणीद्वारे<br>७९६: जनजाती क्षेत्र उपाययोजना,<br>(०१) (२७) राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रम,<br>(२२१० एफ ८३६) (केंद्र हिस्सा)<br>रु.२४,८२,०००/- | डिसेंबर, २०१४ हिवाळी अधिवेशन पुरवणी मागणीद्वारे<br>७९६: जनजाती क्षेत्र उपाययोजना,<br>(०१) (३८) राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रम,<br>(२२१० एफ ९५२) (राज्य हिस्सा)<br>रु. १०००/- (लाक्षणिक मागणी) |

सदर कार्यक्रमांसाठी केंद्र व राज्य हिश्श्याचे प्रमाण ७५ : २५ असे राहिल. या कार्यक्रमाचा समावेश राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत करण्यात आला असून हा कार्यक्रम दि. ३१.०३.२०१७ पर्यंत कार्यान्वित राहील. सदर कार्यक्रमांची उद्दिष्ट्ये व कार्ये पुढील प्रमाणे :

***(१) राष्ट्रीय तंबाखु नियंत्रण कार्यक्रम :*** सन २००४ च्या भारतातील तंबाखू नियंत्रणाच्या अहवालानुसार भारतात प्रतिवर्षी सुमारे ८ त ९ लक्ष लोकांचा मृत्यु हा तंबाखू सेवनामुळे होणाऱ्या आजारांमुळे होतो. याकरिता ११ व्या पंचवार्षिक योजनेत सन २००७-०८ साली भारत सरकारच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयातर्फे राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रम सुरु करण्यात आला आहे. हा कार्यक्रम देशात २१ राज्यातील ४२ जिल्ह्यांमध्ये प्रायोगिक तत्वावर सुरु करण्यात आला आहे. महाराष्ट्रात सन २००९-१० पासून हा कार्यक्रम ठाणे व औरंगाबाद या जिल्यात प्रायोगिक तत्वावर राबविण्यास सुरुवात झाली आहे. सन २०१४-१५ मध्ये नंदुरबार, सातारा, उस्मानाबाद व सिंधुदुर्ग या ४ जिल्हयांमध्ये देखिल राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रम राबविण्यात येणार आहे.

***उद्दिष्ट्ये व कार्ये :*** तंबाखूमुळे आरोग्यावर होणारा दुष्परिणाम आणि तंबाखू नियंत्रण कायद्याविषयी मोठ्या प्रमाणावर जनजागृती करणे व सर्व राज्यभर सिगारेट व अन्य तंबाखूजन्य उत्पादने, कायदा, २००३ ची प्रभावीपणे अंमलबजावणी करणे.

- तंबाखुच्या दुष्परिणामाविषयी आणि तंबाखू नियंत्रण कायद्याविषयी संबंधीत शासकीय / खाजगी संस्थांच्या कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण.
- तंबाखुच्या दुष्परिणामाविषयी विविध पध्दतीचा अवलंब करुन जनजागृती करणे.
- शालेय विद्यार्थी आणि शिक्षक यांना तंबाखुमुळे आरोग्यावर होणाऱ्या दुष्परिणामाविषयी प्रशिक्षण देणे.
- जिल्हास्तरावर तंबाखू व्यसनमुक्तीकरिता सुमपदेशन केंद्र चालविणे.
- तंबाखू नियंत्रण कायद्याच्या अंमलबजावणीबाबत तांत्रिक मदत करणे.
- विविध सरकारी विभाग आणि बिन सरकारी संस्थांबरोबर कामे करुन तंबाखू नियंत्रण करणे.

राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रमाच्या भौतिक तसेच आर्थिक उद्दीष्ठांची पूर्तता करण्यासाठी अंमलबजावणीचे पूर्ण नियोजन, कार्यक्रमाच्या अनुषंगाने विविध कार्य राबविण्याची जबाबदारी कार्यक्रम अंमलबजावणी अधिकाऱ्याची राहील.

हे आदेश, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५ मे, २००९ अन्वये महाराष्ट्र शासन, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-पहिला, उप विभाग-तीन मधील अ.क्र.४ नुसार परिच्छेद क्र. २७ (२) (अ) नुसार केलेल्या सुधारणाप्रमाणे प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०११६१७१८१४४०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sul Dnyandeo L

Digitally signed by Sul Dnyandeo L
DN: CN = Sul Dnyandeo L, C = IN, S = Maharashtra, O = Govt Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2015.01.17 17:20:26 +05'30'

**(ज्ञा. ल. सुळ)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) अपर मुख्य सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई
२) अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई
३) प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
४) सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
५) आयुक्त (कु.क.) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
६) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, आरोग्य भवन, मुंबई
७) सह संचालक, आरोग्य सेवा (असंसर्गजन्य रोग), आरोग्य भवन, मुंबई.
८) सह संचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), आरोग्य भवन, मुंबई.
९) उप संचालक, आरोग्य मंडळ (सर्व)
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
११) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१२) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.

१३) वैद्यकिय आरोग्य अधिकारी (सर्व महानगरपालिका)
१४) जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
१५) मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१६) मा. मंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१७) मा. राज्यमंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१८) अवर सचिव (अर्थ.), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९) अवर सचिव (लेखा), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०) अवर सचिव (आरोग्य-७), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१) निवड नस्ती (आरोग्य-५), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई